Integrated Finance Management System (IFMS) या नवीनविकसित प्रणालीकरिता BEAMS प्रणाली प्राधिकर पत्रान्वये बिल पोर्टल प्रणालीद्वारे कोषागारातून निधी आहारीत करण्यासाठी महामंडळाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना नियंत्रक अधिकारी तसेच लेखा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ईप्रशा २०१९ /(३३३/२०१९)/लपा भाग-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दि. ११/२/२०२०

वाचा :

१) शासन निर्णय क्रमांक संकीर्ण/२०१४ /(३८/२०१४)/लेखा, दि. २२/०७/२०१५

२) शासन निर्णय क्रमांक संकीर्ण/२०१७ /(१२/२०१७)/लेखा, दि. १६/०५/२०१७

**प्रस्तावना**

जलसंपदा विभागा अंतर्गत महामंडळे व त्या अंतर्गत कार्यालयांच्या लेखे व अनुषंगिक अभिलेखांमध्ये एकसुत्रीपणा आणणे, त्या द्वारे उपलब्ध होणाऱ्या माहितीची मांडणी अधिक उपयुक्त व वापर सुलभ करणे व लेख्यांचे तत्परतेने अद्यावतीकरण करणे शक्य व्हावे याकरिता महामंडळांचे लेख्यांचे संगणकीकरण करण्यासंदर्भात आवश्यक सुचना शासन निर्णय दि. २२/०७/२०१५ नुसार देण्यात आलेल्या आहेत.

शासन स्तरावरून महामंडळ व त्यांच्या अधिनिस्त क्षेत्रीय कार्यालयांना होणारे निधी वाटप व त्यातून केला जाणारा खर्च यावर प्रभावी नियंत्रण राखणे शक्य व्हावे यादृष्टीने बीम्स (Budget Estimation, Allocation and Monitoring System)सारखी प्रणाली विकसित करण्यासाठी संबधीत माहितगार अधिकाऱ्यांची समिती संदर्भ क्र २ नुसार स्थापन करण्यात आली आहे.

त्या अनुषंगाने राष्ट्रीय सुचना केंद्रामार्फत (National Informatics Center)Integrated Finance Management System (IFMS) ही नवीन प्रणाली विकसित करण्यात आली आहे. सदर प्रणाली जलसंपदा विभागांतर्गत महामंडळास लागू केल्यानंतर निधीचे कोषागारातून आहरण करण्यासाठी महामंडळाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना नियंत्रक अधिकारी तसेच लेखा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय**

बीम्स (Budget Estimation, Allocation and Monitoring System) संलग्न प्रणाली Integrated Finance Management System (IFMS) राष्ट्रीय सुचना केंद्रामार्फत (National Informatics Center) विकसित करण्यात आली आहे. या प्रणाली द्वारे कोषागारातून निधि आहरण करण्यासाठी महामंडळाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना नियंत्रक अधिकारी तसेच त्यांच्या अंतर्गत लेखा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणे आवश्यक आहे. त्यानुसार सोबत जोडलेल्या यादीनुसार महामंडळाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना नियंत्रक अधिकारी तसेच वरिष्ठ लेखा अधिकारी / लेखा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ १८/२०२०/कोषा-प्रशा-५ दि.२१/०१/२०२० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२१११७००२९३०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Purnima Devang Desai

Digitally signed by Purnima Devang Desai
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=949e11d9f47452e1756c38e35b6f35f56ed936d055f1ff2c622aef6d98ab6f45, cn=Purnima Devang Desai
Date: 2020.02.11 17:02:38 +05'30'

**( पु.दे.देसाई )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.
३. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य., मुंबई.
४. विरोधी पक्ष नेते विधान परिषद / विधानसभा.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (ले व को), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ.
१३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१६. कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/जळगांव/औरंगाबाद/ठाणे.
१७. मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे.
१८. आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. अधीक्षक अभियंता, जलसंपदा ईप्रशासन मंडळ, पुणे.
२०. कार्यासने अर्थ-१/२/लेखा/निवसं, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. लपा कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक- ईप्रशा २०१९/(३३३/२०१९)/लपा भाग-२, दि. ११/२/२०२०

| पाटबंधारे महामंडळ | नियंत्रक अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी | कार्यालयाचा पत्ता |
|---|---|---|---|
| महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे ७७०९१५३२७७ | वरिष्ठ लेखा अधिकारी ९७६४०७४३९२ | सिंचन भवन, ३ रा मजला, बारणे रोड, मंगळवार पेठ, पुणे ४११०११ |
| गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद ९०४९०७०३४९ | लेखा अधिकारी ९८६९१०२२७१ | सिंचन भवन, जालना रोड, औरंगाबाद ४३१००५ |
| तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव ९४२२५५६६६० | लेखा अधिकारी ९४२३९३८९४७ | सिंचन भवन, आकाशवाणी चौक, जळगाव ४२५००१ |
| कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे ८८५०७५१६११ | लेखा अधिकारी ९९६७८३५४५५ | सिंचन भवन, कोपरी, ठाणे (पूर्व) ४००६०३ |
| विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर ९८२२५६४१६५ | लेखा अधिकारी ८२७५२३२८७३ | सिंचन सेवा भवन, सिव्हिल लाइन्स, नागपूर ३४१००१ |